राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियांनातर्गत सोनहिरा दूध उत्पादक प्रक्रिया व कृषिपूरक औद्योगिक सहकारी दूध संघ,जि.सांगली या संघास बळकटीकरण, विस्तारीकरण व आधुनिकीकरणासाठी प्रकल्प राबविण्यास व अर्थसहाय्यास मंजूरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः राकृवि २०१३ /प्र.क्र. ७५ /पदुम-८**

मंत्रालय- विस्तार, मुंबई ४०० ०३२

तारीख: ४ सप्टेंबर, २०१४

वाचा : १) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ८.८.२०१३

२) शासन निर्णय समक्रमांक दिनांक २९.१०.२०१३

३) शासन निर्णय समक्रमांक दिनांक ३.१२.२०१३

**प्रस्तावना :**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत दूध व्यवसाय करणा-या सहकारी संस्थांचे बळकटिकरण/ विस्तारीकरण/आधुनिकीकरण करण्याकरीता केंद्र शासनाच्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत सोनहिरा दूध उत्पादक प्रक्रिया व कृषिपूरक औद्योगिक सहकारी दूध संघ, जि.सांगली या संघास ५०००० लि.प्रति दिन क्षमतेचे दूध प्रक्रिया प्रकल्प उभारणीसाठी रु.३००.०० लक्ष प्रकल्प मंजूर करण्यात आलेला आहे.सदर प्रकल्प राबविण्याकरीता प्रकल्प किंमतीच्या ७५ टक्के राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्सा रु.२२५.०० लक्ष इतका राहणार आहे व २५ टक्के संघाचा हिस्सा म्हणून रु.७५.०० लक्ष इतका निश्चित करण्यात आलेला आहे. त्यापैकी राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत प्राप्त झालेल्या निधीपैकी सन २०१३-१४ मध्ये रु.१२०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधीच्या उपयोगिता प्रमाणपत्राच्या आधारे सन २०१४-१५ मध्ये उर्वरित निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:**

राष्ट्रीय कृषि विकास योजने अंतर्गत राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत सोनहिरा दूध उत्पादक प्रक्रिया व कृषिपूरक औद्योगिक सहकारी दूध संघ, जि.सांगली या संघास रु.३००.०० लक्ष इतक्या रकमेच्या मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पासाठी एकूण रु.२२५.०० लक्ष इतक्या राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियान हिस्स्यापैकी सन २०१३-१४ मध्ये रु. १२०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यात आलेला आहे. उर्वरित राष्ट्रीय पूरक प्रथिने निर्माण अभियानांतर्गत वितरीत करावयाच्या रु.१०५.०० लक्ष इतक्या निधीपैकी सन २०१४-१५ मध्ये रु. १००.०० लक्ष निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधी अनुषंगाने संघ हिस्स्यापोटीचा २५ टक्के म्हणजेच रु.३३.००लक्ष इतका निधी गुंतविणे आवश्यक आहे.

२. शासनाने मंजूर केलेल्या प्रकल्प किंमतीपेक्षा जास्तीचा होणारा खर्च हा संघाने स्वत: करणे आवश्यक राहील. त्याकरीता शासनामार्फत अतिरीक्त निधी मंजूर करण्यात येणार नाही. तसेच विहित कालावधीत प्रकल्प राबविण्यास विलंब झाल्यास वितरीत निधी व्याजासह वसूल करण्यात येईल.

३. सदर योजनेअंतर्गत वितरीत करण्यात आलेला निधी विनियोग केला असल्याबाबतचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित जिल्हयाच्या दुग्धव्यवसाय विकास अधिकारी / प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास यांनी संघाकडून प्राप्त करुन घ्यावे व ते शासनास सादर करावे. तसेच प्रकल्पाच्या प्रगतीबाबत आढावा घेण्यासाठी त्रैमासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा.

४. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेला निधी खर्च करण्याकरीता अटी व शर्ती हया दिनांक ८.८.२०१३ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केल्याप्रमाणे कायम राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४११०११९९७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sathe Shashank M

Digitally signed by Sathe Shashank M
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sathe Shashank M
Date: 2014.09.04 10:57:22 +05'30'

**(श.मा.साठे)**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. अपर मुख्य सचिव (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव (पदुम) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे
४. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे
५. आयुक्त दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, वरळी, मुंबई-४०० ०१८
६. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी,पुणे विभाग,पुणे
७. विभागीय उपनिबंधक सहकारी संस्था (दुग्ध) पुणे विभाग, पुणे
८. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी, सांगली
९. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, सांगली
१०. जिल्हा अधिक्षक, कृषि अधिकारी, सांगली
११. व्यवस्थापकीय संचालक, सोनहिरा दूध उत्पादक प्रक्रिया व कृषिपूरक औद्योगिक सहकारी दूध संघ, जि.सांगली
१२. कक्ष अधिकारी, राकृवियो कक्ष, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. निवड नस्ती